**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः परिवि-२०२०/प्र.क्र.१६४/सेवा-३**

दहावा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०७ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६.
२) शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवि-२७१८/प्र.क्र.२/आठ, दिनांक ७ फेब्रुवारी, २०१८.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः मभाप-१०८७/१४/सीआर-२/८७/२०, दिनांक ३० डिसेंबर १९८७.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" या पदावर दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीकरीता सदर शासन आदेशात असलेल्या खालील तक्त्यात नमूद वैद्यकीय अधिकारी यांची नियुक्ती करण्यात आली आहे. सदर नियुक्ती सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत गठित स्वतंत्र मंडळाने केलेल्या शिफारशीनुसार "वैद्यकीय अधिकारी गट-अ"या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्तीने करण्यात आलेली आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा येथे नमूद शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून, वैद्यकीय अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ या पदावर पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांचा दोन वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता सदर परिच्छेदात नमूद तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी या परिच्छेदातील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र.५ मध्ये नमूद दिनांकास (म.नं.) समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक (म.पू.) स्तंभ क्र.७ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | कार्यालय | वै.अ.पदावरील रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी पुढे ढकलल्याची कारणे | वै.अ.पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १. | डॉ. कैलाश वसराम राठोड | उपजिल्हा रुग्णालय, पुसद जि. यवतमाळ | दि.२२.०६.२००६ | दि.१५.०७.२०१४ | सा.प्र.वि. शा.नि. दि.२९.०२.२०१६ मधील नियम क्र.६(२) नुसार | दि.१६.०७.२०१४ |

३. सदर शासन आदेश वाचा येथे नमूद शासन निर्णय/शुध्दीपत्रक यांमधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सामान्य प्रशासन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१७५/का-८, दि.१०.०७.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०३१३०९४६८९१७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AVINASH SARDAR JADHAV

Digitally signed by AVINASH SARDAR JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=77e749a5820964d03e94305adeb0ee2ffb2c5f02efc5b019e8b49dc59175a25c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA8FDCAA7AE61AB4BED501E19D794BD7197874F2989B98780B1607ADCBDFE844, cn=AVINASH SARDAR JADHAV
Date: 2023.08.07 18:34:24 +05'30'

**( अ.स.जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा व कु.क.तथा संचालक, रा.आ.अ, आरोग्य भवन,मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल, लेखापरीक्षा- १, महाराष्ट्र, मुंबई.

५. महालेखापाल, लेखापरीक्षा- २, महाराष्ट्र, नागपूर.

६. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई.

७. उपसंचालक, आरोग्य सेवा अकोला मंडळ, अकोला.

८. जिल्हा शल्य चिकित्सक, अकोला.

९. जिल्हा आरोग्य अधिकारी, अकोला.

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.

११. संबंधित वैद्यकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्यामार्फत.

१२. निवडनस्ती (कार्यासन सेवा-३).